**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः उसप-१३१४/प्र.क्र.६०/का.१४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०३.११.२०१४

**पहा:- सा.प्र.वि. क्रमांक:- बीसीसी-२००१/१८८७/प्र.क्र.६४/०१/१६-ब, दि.०१.०४.२००८**

**आदेश**

याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून तसेच याचिका क्र. १३१२/१९९८, २९८२/२०००, २९८६/२०००, ४९५८/२००३ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून खाली नमूद केलेल्या अवर सचिवांना उपसचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र | अवर सचिवांचे नाव, जाती-प्रवर्ग | सध्याचा विभाग | उपसचिव पदावरील पदोन्नतीने पदस्थापना दिलेला विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.बा.म.राऊत (खुला) | उच्च व तंत्र शिक्षण विभाग | नियोजन विभाग (रोहयो) |

२. सदर अधिका-यांची उपसचिव पदावरील तदर्थ पदोन्नती त्यांच्याविरुध्द आदेशाच्या दिनांकापर्यत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही या धारणेच्या अधीन तसेच खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

(अ) सदर तदर्थ पदोन्नती प्रथम अकरा महिने किंवा सामान्य प्रशासन विभागाकडून निवडसूचीवरील नियमित उपसचिव नियुक्त होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरिता असेल.

(ब) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिका-यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. हे आदेश तात्काळ अमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याला संबंधित विभागाने तात्काळ कार्यमुक्त करून या विभागास कळवावे. तसेच पदोन्नत अधिकाऱ्याने पदस्थापना केलेल्या विभागात तात्काळ रूजू व्हावे. पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या विनंतीची दखल घेण्यात येणार नाही.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११०३१३२३४०७५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400020, st=Maharashtra, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2014.11.03 13:37:27 +05'30'

**(स.का.जोंधळे)**
उप सचिव, महाराष्ट्र राज्य

प्रत,

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव
३. प्र.स.(सेवा), सा.प्र.वि.,
४. अमुस/प्रधान सचिव/ - उ.व तं.शि.वि/नियोजन विभाग
५. सह/उप सचिव/(आस्थापना), उ.व तं.शि.वि/नियोजन विभाग
६. संबंधित अधिकारी (विभागामार्फत)
७. निवड नस्ती.